२०१०११२५२१५५५६००१
नाशिक विभाग विकास कार्यक्रम-२००९ जुन्या ल
पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-यांची दुरुस्ती.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र. लपायो-२००९/प्र. क्र. ४७ /जल-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक :- २४ नोव्हेंबर, २०१०.

वाचा :-

१ ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्रं.लपायो-१०९९/प्र.क्र.३४७/जल-१ दिनांक ३१ जुलै, २०००

२ मुख्य सचिवांचे कार्यालय, सामान्य प्रशासन विभाग यांची मंत्रिमंडळाच्या बैठकीचे कार्यवृत्त दिनांक ०७ ऑगस्ट, २००९

३ नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक नाविका-२००९/प्र.क्र.१२/का.१४२०, दि. २८ ऑगस्ट, २००९

४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्रमांक लपायो-२००९/प्र.क्र.१०५/जल-४ दिनांक २४ नोव्हेंबर, २००९.

५ मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे जा.क्र.मुअ/लपा/उविअ-१/प्र.शा.५/३६५५, दि. १२/७/२०१० चे पत्र.

प्रस्तावना :-

राज्यातील नाशिक प्रादेशिक विभागामध्ये ० ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेअंतर्गत पाझर तलाव गाव तलाव/कोल्हापूर पध्दतीचे बंधारे / साठवण बंधारे आहेत. सदर बांधकामाव्दारे प्रतिवर्षी पावसाळा निर्माण झाल्यानंतर भूगर्भातील पाणी पातळीमध्ये वाढ होऊन लगतच्या विहीरीच्या पाणी पातळीमध्ये वाढ होऊन अप्रत्यक्ष / प्रत्यक्ष सिंचन क्षेत्र सुविधा उपलब्ध झाली आहे. तथापि बांधण्यात आलेल्या पाझर तलाव / गाव तलाव बंधा-यांची निधी अभावी वेळोवेळी दुरुस्त्या न झाल्याने दुरावस्था झालेली आहे. तसेच काही कोल्हापूर पध्दतीचे बंधारे/ साठवण बंधारे अतिवृष्टीमुळे कोल्हापुरी बंधा-याची निधी अभावी वेळोवेळी नियमित दुरुस्त्या न झाल्याने दुरावस्था झालेली आहे. तसेच अवर्षण प्रवण क्षेत्रातील कोल्हापुरी बंधा-यांचे अतिवृष्टीमुळे मोठ्या प्रमाणात पाश्र्वप्रवहन होऊन त्यांचे नुकसान झालेले आहे. पाझर तलाव / गाव तलावातील गळती कमी करणे व अन्य काही अत्यावश्यक दुरुस्त्या केल्यामुळे बांधकामे पुर्वत होऊन संकल्पीत सिंचन क्षमता पुनर्स्थापित होणार आहे व शेतक-यांचा व नागरिकांचा पिण्याचा पाण्याचा व जनावरांच्या पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सुटण्यास बहू अंशी मदत होणार आहे. म्हणून पाझर तलाव/गाव तलाव / कोल्हापूर पध्दतीचे बंधारे/साठवण बंधा-यांची दुरुस्ती करण्याबाबत लाभधारकांकडून होणारी सततची मागणी विचारात घेऊन नाशिक येथे दिनांक ०२ जुलै, २००९ झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीमध्ये नाशिक विकास कार्यक्रमांतर्गत दुरुस्तीबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सदर कार्यक्रमाचा कालावधी तीन वर्षाचा असल्याने त्याची अंमलबजावणी सन २००९-१० ते २०११-१२ या आर्थिक वर्षांमध्ये पुर्ण करणे आवश्यक आहे. त्यासाठी दुरुस्तीच्या कार्यक्रमाचे धोरण निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

नाबार्ड विकास कार्यक्रम २००९ अंतर्गत जुन्या लघु पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-यांची दुरुस्तीचे धोरण निश्चित करण्याचा निर्णय शासनाने खालीलप्रमाणे घेतला आहे.

२. सन २००९-१० ते २०११-१२ या आर्थिक वर्षामध्ये सदर कामांसाठी रुपये २०००.०० लक्ष एवढा नियतव्यय मंजूर केला आहे.

३. पाझर तलाव / गाव तलाव / कोल्हापूर पध्दतीचे बंधारे / साठवण बंधा-याच्या विशेष दुरुस्तीसाठी शासनाने स्वतंत्र असे मापदंड व निकष निश्चित केले नाहीत. कोल्हापूर पध्दतीचे बंधारे /साठवण बंधा-यांना पुरामुळे नुकसान होऊन तीरावरील मातीचे पार्श्ववहन होऊन व कालांतराने बांधकामाची झीज होऊन नुकसान झालेले आहे. म्हणून त्यामध्ये कॅाक्रीट कोपींग, दोन्ही तीरावरील संरक्षण भिंती व खचलेले मातीकाम इत्यादीचा समावेश विशेष दुरुस्तीमध्ये करण्यात यावा. तसेच पाझर तलाव /गाव तलाव पाणीसाठा पुर्नप्रस्थापित करणेसाठी गाळ काढणे, उंची पुर्ववत करणे, गळती कमी करण्यासाठी सीओटी खोदून अभेद्य भिंतीसाठी मातीकाम करणे, भराव्यातील गळती कमी करण्याकरिता अश्मपटल काढून अभेद्य अस्तराचे काम करणे, अश्मपटलाची तसेच सांडवाभिंत / पक्षभिंतीचे काम संधानकाने करणे इत्यादीचा समावेश दुरुस्तीच्या कामात करता येईल.

विशेष दुरुस्ती मुख्यत: लघु पाटबंधारे तलाव, साठवण तलाव, पाझर तलाव, गाव तलाव कोल्हापूर पध्दतीचे बंधारे व साठवण बंधारे या योजनांसाठी खालील कारणांमुळे प्रस्तावित आहे.

(अ) संकल्पनात अंतर्भूत पर्जन्यमानापेक्षा जास्त पर्जन्यवृष्टी झाल्याने आऊट फलॅंकींग होऊन मोठया प्रमाणात पार्श्ववहन होते.

(ब) नाल्याचे काठ स्थिर नसल्याने

(क) महत्तम पुरामुळे मुख्य पात्रातील लघु पाटबंधारे तलाव, गाव तलाव, पाझर तलाव, साठवण तलावाचा काही भाग अथवा कोल्हापूर पध्दतीचा बंधारा इत्यादी खांब वाहून जाणे.

(ड) तिराच्या भागातील बांधकामांचा गुंतावा अपुरा राहील्याने काठाचे नुकसान ( **Insufficient keying with River Banks & foundation Course** )

(ई) पाणलोट क्षेत्र व त्यातील येवा आकडेमोड चुकल्याने तसेच त्यांचे अनुषंगिक तरतूदी चुकल्याने झालेले आऊट फलॅंकींग

(फ) १ ऑक्टोबर नंतर पूरपरिस्थिती उद्‌भवल्याने टाकलेले निडल्स बाजू भराव इत्यादीचे नुकसान.

(ग) पाझर तलावातील गळती कमी करणे व रोखणे.

(ए) सांडव्याची पडझड दुरुस्ती करणे, कमी झालेला पाणीसाठा पुनर्स्थापित करणे.

सिंचन व्यवस्थापनात लाभधारकांचा सहभाग अधिक प्रभावी होण्याकरीता पाटबंधारे विभागाकडून अवलंबविण्यात येणा-या पध्दतीत सुधारणा करुन ग्रामविकास व जलसंधारण विभागांतर्गत २५० हेक्टर पर्यंतच्या सिंचन क्षमतेच्या योजनासाठी लाभधारकांची सहकारी पाणी वापर संस्था स्थापन करुन त्यांना सिंचन क्षेत्र हस्तांतरित करण्याचे धोरण महाराष्ट्र शासन ग्राम विकास व जलसंधारण विभाग संदर्भ क्रमांक १ अन्वये स्विकारले आहे. त्यातील सूचनांचे कटाक्षाने पालन करावे.

४. सदर विशेष दुरुस्तीच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहील :-

(अ) कार्यान्वित यंत्रणा:-

विशेष दुरुस्ती कामे बांधकामाची मालकी ज्या यंत्रणेकडे आहे ( जिल्हा परिषद किंवा स्थानिक स्तर ) त्यांनीच अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, नाशिक यांच्या देखरेख व नियंत्रणाखाली करावीत.

(ब) तांत्रिक मान्यता :-

प्रस्तावित विशेष दुरुस्तीच्या कामाना तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका १९८४ मधील परिशिष्ठ ४२ अ.क्र.१३ (३) अ व ब नुसार मंडळाच्या अर्थसंकल्पीत तरतूदीच्या मर्यादेत नियंत्रक अधिकारी यांना म्हणजे अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, नाशिक याना पूर्ण

अधिकार व कार्यकारी अभियंता यांना मंजूर अर्थसंकल्पित तरतुदीच्या अधिन राहून प्रत्येक प्रकरणात रुपये ५.०० लक्ष पर्यंत अधिकार प्रदान करण्यात येत आहे.

(क) कामावरील देखरेख व कामाचे मुल्यमापन :-

(१) वरील कामावरील देखरेख व कामाचे मुल्यमापन जिल्हा स्तरावर चक्रीय पध्दतीने ( जिल्ह्यातील पहिल्या उपविभागाचे कामाचे मूल्यमापन व तपासणी दुस-या उपविभागाने करावे, दुस-या उपविभागाचे कामांचे मुल्यमापन व तपासणी तिस-या उपविभागाने करावी. याप्रमाणे शेवटच्या उपविभागाने पाहिल्या उपविभागाचे कामाचे मूल्यमापन व तपासणी करावी. मात्र दुस-या उपविभागाचे मुल्यमापन व तपासणी पहिल्या उपविभागाने करु नये म्हणजेच प्रत्येक उपविभागाने आपआपसात कामाचे मुल्यमापन व तपासणी करु नये ) करुन कार्यपुर्तीचा अहवाल मंडळ कार्यालयास सादर करावा. मंडळ कार्यालयाने एकत्रित अहवाल मुख्य अभियंता व शासनास सादर करावा.

(ड) इतर संकिर्ण :-

(१) विशेष दुरुस्तीचे अंदाजपत्रक तयार करण्यापुर्वी दुरुस्तीच्या कामाची मोजमापे दोन उप अभियंता मार्फत संयुक्तपणे घेण्यात यावी.

(२) विशेष दुरुस्तीसाठी मापदंड निश्चित केले नसल्यामुळे मंजूर अंदाजित किंमतीच्या आधारे प्रचलित नियमानुसार योग्य ती कार्यपध्दती अवलंबून दुरुस्तीची कामे पूर्ण करावीत.

(३) विशेष दुरुस्तीचा निधी प्रचलित धोरणानुसार शासनाकडून थेट नियंत्रक अधिकारी अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, नाशिक यांचेकडे वर्ग करण्यात येइल.

(४) नियंत्रक अधिकारी यांना प्राप्त झालेला निधी वेळेत खर्च व सिंचन क्षमता पुनर्स्थापित न झाल्यास, अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांना जबाबदार धरण्यात येईल.

(५) विशेष दुरुस्ती हाती घेण्यापुर्वी पाणी वापर सहकारी संस्थेकडून योजना हस्तांतर करुन घेण्याचे हमीपत्र घ्यावे व विशेष दुरुस्तीची कामे पूर्ण केल्यानंतर सदर बांधकाम, व्यवस्थापनासाठी पाणीवापर सहकारी संस्थेस / ग्रामपंचायत यांना त्वरीत हस्तांतरीत करण्यात यावेत.

(६) नाशिक पॅकेज अंतर्गत दुरुस्तीसाठी प्रस्तावित केलेल्या योजना इतर कुठल्याही शिर्षाअंतर्गत दुरुस्तीसाठी प्रस्तावित नसल्याबाबत अधीक्षक अभियंता यांनी खात्री करुन प्रमाणित करावे.

४ पाणीवापर संस्थेस व्यवस्थापन , पाणीपट्टी वसूली व या वसूलीतून योजनेतील धरण व शिर्षकामे कालवा विमोचक वितरिका व वितरण व्यवस्था यांच्या देखभाल दुरुस्तीची कामे करावी लागणार आहेत. तसेच मोठ्या दुरुस्त्या अतिवृष्टीने झालेल्या नुकसानीची दुरुस्ती तसेच काही कामे अपूर्ण असल्यास ती पूर्ण करणे ही कामे शासनामार्फत केली जाणार असल्यामुळे पाणीपट्टी वसूलीच्या ८० टक्के रक्कम पाणी वापर संस्था व उर्वरित २० टक्के रक्कम शासनाकडे जमा करणे संयुक्तीक होईल.

५. नाशिक विभाग विकास कार्यक्रम २००९ अंतर्गत ० ते २५० हेक्टर पर्यंत सिंचन क्षमतेच्या जुन्या लघु पाटबंधारे कामांची दुरुस्तीची रुपये २०.०० कोटी एवढा नियतव्यय तीन वर्षांच्या कालावधीसाठी मंजूर आहे. सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये रुपये ८००.०० लक्ष एवढा निधी मंजूर करण्यात आला असून वितरणाचे आदेश स्वतंत्ररित्या काढण्यात येतील.

६. यावर होणारा खर्च ( मागणी क्रमांक एल ३, २७०२, लहान पाटबंधारे-१९६ जिल्हा परिषदांना सहाय्य ०२ परिरक्षण व दुरुस्ती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (स्थानिक क्षेत्र ), (०३) (०२) नाशिक विभागातील जुन्या लघु पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-यांची दुरुस्ती ( खानदेश पॅकेज ) ( ० ते १०० हेक्टर ) ( २७०२ ८३६३ ) ३५ लहान बांधकामे ( दत्तमत ) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

८. ... १०१ ते २५० हेक्टर सिंचन क्षमतेच्या जुन्या लघु पाटबंधारे योजना व कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-यांच्या ... योजनांसाठी यावर होणारा खर्च ( मागणी क्रमांक एल ७, ४७०२, लहान पाटबंधारे- (००) ८००- इतर खर्च (०१) - लहान पाटबंधा-याची कामे (१०१ ते २५० हेक्टर), (०३) जुन्या लघु पाटबंधारे व कोल्हापूर पध्दतीच्या बंधा-यांची दुरुस्ती ( १०१ ते २५० हेक्टर ) ( ४७०२ ७५७९ ), ५३ मोठी बांधकामे-( दत्तमत ) या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

९. हा शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक ९२/१४३४ दिनांक ६/१०/२०१० व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २६२/व्यय १५ व ७८५/अर्थसंकल्प १७ दिनांक १८/११/२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( प्र. के. मोटे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त . नाशिक
२) मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) महाराष्ट्र राज्य, पुणे
३) मा. मंत्री (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल-१, महाराष्ट्र, मुंबई ( लेखा परिक्षण व लेखा अनुज्ञेयता)
६) महालेखापाल-२, महाराष्ट्र, नागपूर,(लेखा परिक्षण व लेखा अनुज्ञेयता)
७) अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर ) मंडळ, नाशिक
८) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर
९) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) विभाग,नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर
१०) कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे,जिल्हा परिषद, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर
१२) जिल्हा कोषागार अधिकारी,नाशिक, धुळे, नंदुरबार, जळगांव, अहमदनगर
१३) सचिव (जलसंधारण) यांचे स्वीय सहायक, ग्रामविकास व जलसंधारण विभाग.
१४) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा यांचे स्वीय सहायक,मुंबई ४०० ०३२
१५) नियोजन विभाग ,कार्यासन १४३४,मुंबई ४०० ०३२
१६) वित्त विभाग ( व्यय १५ व अर्थ १७ ),मुंबई ४०० ०३२
१७) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१८) ग्रा.वि. व ज.सं.वि. का.क्र. वित्त-१,वित्त-२,वित्त-६, जल-१,जल-२,जल-११, जल-१९.
१९) निवड नस्ती. कार्यासन क्र. जल-४,ग्रामविकास व जलसंधारण विभाग.